राज्यामध्ये राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद यंत्रणांतर्गत डायल-११२ प्रकल्प राबविण्यासाठी तसेच प्रकल्पाशी निगडीत आवश्यक बाबींवर निधी खर्च करण्यासाठी केंद्र शासनाकडुन प्राप्त निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः वितंप्र- ३६१७/प्र.क्र.११/भाग-३/पोल-३**

गृह विभाग, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २२ फेब्रुवारी, २०२३

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५.
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.६४/विशा-३(अ), दि.०४.०८.२०१७.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र.१५०११/१९/२०१६-NERS (PM), दि.१६.०५.२०१७.
४) शासन निर्णय, गृह विभाग क्र. वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/पोल-३, दि.०४.०९.२०१७.
५) शासन निर्णय, गृह विभाग क्र. वितंप्र ३६१७/प्र.क्र.११/पोल-३, दि.२८.०२.२०१९.
६) अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक १४.०८.२०१९ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
७) अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई व मे. महेंद्रा डिफेन्स सिस्टिम्स लि. यांच्यात दि.११.११.२०१९ रोजी झालेला करार.
८) केंद्र शासनाचे पत्र क्र.F.No.१५०११/१९-२०१६-NERS(PM)(WS-II), दि.१८.०८.२०२०.
९) शासन निर्णय, गृह विभाग क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-३/पोल-३, दि.०५.१०.२०२१.
१०) शासन निर्णय, गृह विभाग क्र.वितंप्र-३६१७/प्र.क्र.११/भाग-३/पोल-३, दि.१२.०१.२०२३.
११) मे. महेंद्रा डिफेन्स सिस्टिम्स लि. यांची दि.१०.११.२०२२, दि.११.११.२०२२ व दि.१२.११.२०२२ रोजीची देयके.
१२) अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१७/६१६२/ MERS-डायल-११२/८१/२०१७-२१, दि.१७.०१.२०२३.

प्रस्तावना -

देशात पोलीस, अग्निशामक व रुग्णवाहिका या आपत्कालीन सेवा अनुक्रमे १००, १०१ व १०८ या वेगवेगळ्या दुरध्वनी क्रमांकावर उपलब्ध करुन देण्यात आलेल्या आहेत. तथापि सदर आपत्कालिन सेवांसाठी वेगवेगळे दुरध्वनी क्रमांक असल्याने नागरिकांमध्ये याबाबत संभ्रम निर्माण होवून आपत्कालीन परिस्थितीमध्ये पोलीस/अग्निशामक/ रुग्णवाहीका या आपत्कालीन सेवा विहीत वेळेत उपलब्ध होण्यास विलंब होण्याची शक्यता असते, त्यामुळे सदर आपत्कालीन सेवा संपुर्ण देशामध्ये एकाच टोलफ्री क्रमांकावर (डायल-११२) उपलब्ध करुन देण्याबाबत केंद्र शासनाने निदेश दिले आहेत.

केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेला रु.१२८४.६६ लक्ष इतक्या रक्कमेपैकी संदर्भ क्र.९ येथील शासन निर्णयान्वये रु.८,५४,३६,०६०/- इतकी रक्कम वितरीत करण्यात आली आहे. तसेच सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात अखर्चित राहिलेला रु.४,३०,२९,९४०/- (रुपये चार कोटी तीस लाख एकोणतीस हजार नऊशे चाळीस फक्त) इतका निधी खर्च करण्यासाठी जुलै २०२२ च्या अधिवेशनात पुरवणी मागणीच्या प्रस्तावास मान्यता मिळाली आहे. त्यापैकी संदर्भ क्र.१० येथील शासन निर्णयान्वये रु.३,८२,०८,५७७/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र.८ च्या पत्रान्वये सदरचा निधी राज्य शासनास वितरित केला असून पुढे पुनर्जिवित करण्याची आवश्यकता नाही, असे कळविले आहे.

राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण, बळकटीकरण करण्याबाबतच्या प्रस्तावास दिनांक ०३.०८.२०१७ रोजी झालेल्या राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीत मंत्रिमंडळाने मान्यता दिली आहे. त्यानुसार संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण करण्याकरिता रु.४२९.०६ कोटीच्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१४.०८.२०१९ रोजीच्या बैठकीत रु.४०४,४४,६१,५१९/- (चारशे चार कोटी चव्वेचाळीस लाख एकसष्ठ हजार पाचशे एकोणवीस फक्त) इतक्या प्रकल्प खर्चासह मे. महेंद्रा डिफेन्स सर्व्हिसेस लि. यांना Letter of Intent (LOI) निर्गमित करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्याअनुषंगाने राज्यातील

पोलीस नियत्रण कक्षांचे आधुनिकीकरण (डायल-११२) प्रकल्पाकरिता अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई तसेच मे. महेंद्रा डिफेन्स सर्व्हिसेस लि. यांच्यात करार करण्यात आला आहे.

डायल-११२ प्रकल्पाचे पुरवठादार मे. महेंद्रा डिफेन्स सर्व्हिसेस लि. यांनी खालील प्रमाणे देयके सादर केली आहेत :-

(i) मे. महेंद्रा डिफेन्स सर्व्हिसेस लि. यांनी BI, Reporting, MIS and Analytics tool Supply and commissioning of IT and non-IT components at DC (४०% of Capex-१) and DRC (४०% of Capex-२), phase-I साठी सादर केलेल्या रु.१,९१,२०,८९४/- इतक्या रक्कमेतून दंडाची (Applicable penalty for delay in Supply and installation of BI tool) रक्कम रु.६,११,८६९/- वजा करुन अदा करावयाची रक्कम जीएसटी सह रु.१,८५,०९,०२५/-.

(ii) डायल-११२ प्रकल्पाकरिता जानेवारी २०२० ते डिसेंबर २०२० पर्यंत Human Resources (४३ technical manpower)-Go-Live of DC, DR, PCC, SCC & DCR phase for Capex-६ करीता जीएसटी सह रु.३,७६,२६,०९५/-.

(iii) तसेच डायल-११२ प्रकल्पाच्या Capacity Building and Training (Capex-७) Go-Live of DC, DR, PCC, SCC & DCR phase-I & II साठी रु.१६,६३,१००/- इतकी रक्कम देय आहे.

वरीलप्रमाणे मे. महेंद्रा डिफेन्स सर्व्हिसेस लि. यांनी सादर केलेल्या देयकांपैकी (रु.१,८५,०९,०२५+३,७६,२६,०९५+१६,६३,१००) एकूण रु.५,७७,९८,२२०/- इतकी देय रक्कम अदा करण्याची विनंती अपर पोलीस महासंचालक (नि. व स.), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भ क्र.१२ येथील पत्रानुसार केली आहे. तसेच सदरची देयके डायल-११२ प्रकल्प सल्लागार समितीने तपासली

असून सदर देयकांबाबत प्रकल्प सल्लागार अर्नेस्ट ॲण्ड यंग यांनी अपर पोलीस महासंचालक (नि. व स.) यांना दि.२४.१२.२०२२ व दि.०५.०१.२०२३ च्या अग्रेषित केलेल्या पत्रान्वये अभिप्राय सादर केले आहेत.

राज्यातील पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण (डायल-११२) प्रकल्पाकरिता खरेदी केलेल्या यंत्रसामग्रीची व सदर यंत्रसामग्री कार्यान्वित करण्याकरिता आलेल्या एकुण रु.५,७७,९८,२२०/- इतक्या देय रकमेतून केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या (रु.१२८४.६६ लक्ष) रक्कमेपैकी शिल्लक रु.४८,२१,३६३/- (रुपये अठ्ठेचाळीस लाख एकवीस हजार तीनशे त्रेसष्ट फक्त) इतका निधी वितरित करणेबाबतची बाब विचाराधीन होती, त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण (डायल-११२) प्रकल्पाच्या BI, Reporting, MIS and Analytics tool Supply and commissioning of IT and non-IT components at DC (४०% of Capex-१) and DRC (४०% of Capex-२), phase-I साठी रु.१,९१,२०,८९४/- इतक्या रक्कमेतून दंडाची (Applicable penalty for delay in Supply and installation of BI tool) रक्कम रु.६,११,८६९/- वजा करुन अदा करावयाची रक्कम जीएसटी सह रु.१,८५,०९,०२५/-, जानेवारी २०२० ते डिसेंबर २०२० पर्यंत Human Resources (४३ technical manpower)-Go-Live of DC, DR, PCC, SCC & DCR phase for Capex-६ करीता जीएसटी सह रु.३,७६,२६,०९५/- इतकी रक्कम व Capacity Building and Training (Capex-७) Go-Live of DC, DR, PCC, SCC & DCR phase-I & II साठी रु.१६,६३,१००/- अशी एकूण रु.५,७७,९८,२२०/- (रुपये पाच कोटी सत्त्याहत्तर लाख अठ्ठयाण्णव हजार दोनशे वीस फक्त) इतक्या देय रकमेतून केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या (रु.१२८४.६६ लक्ष) रक्कमेपैकी शिल्लक रु.४८,२१,३६३/- (रुपये अठ्ठेचाळीस लाख एकवीस हजार तीनशे त्रेसष्ट फक्त) इतकी रक्कम वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कमेची देयके अदा करतांना प्रचलित कर वजाती करुन अदा करण्यात यावी.

३. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च हा खर्च “मागणी क्र. बी-०१, २०५५-पोलीस, ११५-पोलीस दलाचे आधुनिकीकरण, ०१-विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प, (०१)(०२) - महाराष्ट्र आपत्ती प्रतिसाद यंत्रणा राबविण्याकरीता पोलीस नियंत्रण कक्षांचे आधुनिकीकरण (१००% केंद्र पुरस्कृत) (२०५५ ए१३२), ५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरहु निधी आहरित करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणुन घोषीत करण्यात येत आहे. तसेच त्यांनी उपरोक्त निधी आहरित करुन MAHINDRA DEFENCE SYSTEMS LTD या कंपनीच्या २०९-२१४, Kailash Building २६, Kasturba Gandhi Marg, New Delhi-११०००१ येथील HDFC बँकेच्या शाखेचे खाते क्र.०००३०३१००१४८०० (IFSC Code - HDFC००००००३) या खात्यावर जमा करावा.

५. सदर निधी राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद यंत्रणांतर्गत डायल-११२ प्रकल्प राबविण्यासाठी तसेच प्रकल्पाशी निगडीत आवश्यक बाबींवर निधी खर्च करण्यासाठी केंद्रीय गृह मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या दि.१६.०५.२०१७ च्या पत्रामधील अटी व शर्तीनुसार खर्च करावा व खर्च करण्यात आलेल्या रकमेची विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्रे (Form १९-A) मध्ये भरुन केंद्रीय गृह मंत्रालय, नवी दिल्ली यांना सादर करावीत व त्याची एक प्रत राज्य शासनास सादर करावी. तसेच नियम GFR rule २११ (१) नुसार अनुदाबाबत खाता मंजूर प्राधिकारी केंद्रीय गृह मंत्रालय यांच्या अंतर्गत ऑडिट शाखेस वेळोवेळी तपासणीसाठी उपलब्ध करुन देण्यात यावे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.०६/२०२३/व्यय-७, दि.०५.०१.२०२३ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२२१७२६५४९४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAIKWAD KAILAS ARJUN

Digitally signed by GAIKWAD KAILAS ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb,
pseudonym=98E519306D20397D354BD181099105F0AC1EFDEC,
serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=GAIKWAD KAILAS ARJUN
Date: 2023.02.22 17:33:32 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. अपर पोलीस महासंचालक, नि. व स., महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०.महालेखापाल) ,लेखा परीक्षा ,(महाराष्ट्र.नागपूर/मुंबई ,२/१-
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. मे. महेंद्रा डिफेन्स सर्व्हिसेस लि., अंधेरी पुर्व.
१४. वित्त विभाग, व्यय-७/वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई.
१५. अर्थसं-१/गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. रोख शाखा/गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवडनस्ती, पोल-३.